राज्यातयुवा पर्यटन मंडळाची (Youth Tourism Club) स्थापनाकरण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : टिडीएस २०२३/०७/प्र.क्र.३००/पर्यटन,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १८ जुलै, २०२३.

**संदर्भ**:-१. संचालक, केंद्रीय माध्यमिक शिक्षा बोर्ड यांचे पत्र दि.११/०५/२०२२.
२.मा.केंद्रीय पर्यटन मंत्री, पर्यटन मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र दि.२९/०५/२०२३.

**प्रस्तावना**:-

पर्यटन मंत्रालय, भारत सरकार मार्फत स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवाचा भाग म्हणून युवा पर्यटन मंडळे (Youth Tourism Club) स्थापन करण्यात येत आहेत. देशातील पर्यटन, समृद्ध वारसा व संस्कृती यांचे माहितीगार म्हणून जागतिक स्तरावर देशातील प्रसिध्दी करतील असे भारतीय पर्यटनाचे युवा राजदूत घडविण्यासाठी युवा पर्यटन मंडळांची स्थापना करावयाची आहे. यातून विद्यार्थी व तरुणांमध्ये संघभावना, व्यवस्थापन नेतृत्व आणि सेवा यासारखी महत्वाची कौशल्ये आत्मसात करण्याची वृत्ती तसेच शाश्वत व जबाबदार पर्यटनाची जाणीव जागृती निर्माण करण्यास सहाय्य होईल.

२. राज्यातील सर्व मान्यता प्राप्त शाळा / कनिष्ठ महाविद्यालये आणि विद्यालयांमध्ये ७ वी च्या पासून पुढील वर्गातील विद्यार्थ्यांसाठी युवा पर्यटन मंडळाची (Youth Tourism Club) स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक** :-

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवाचा भाग म्हणून पर्यटन मंत्रालय, भारत सरकार यांच्या निर्देशानुसार राज्यातील सर्व मान्यता प्राप्त शाळा / कनिष्ठ महाविद्यालये आणि विद्यालयांमध्ये ७ वी च्या पासून पुढील वर्गातील विद्यार्थ्यांसाठी युवा पर्यटन मंडळाची (Youth Tourism Club) स्थापना करावयाची आहे. याकरीता आवश्यक कार्यवाही शालेय शिक्षण व क्रीडा विभाग आणि उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांनी करावी.

२. याकरीता केंद्र शासनामार्फत तया रकरण्यात आलेली हस्तपुस्तिकेची (Handbook) ची प्रत सोबत जोडली आहे. या व्यतिरिक्त पर्यटन विषयक प्रसिद्धी व प्रचलनासाठी विविध उपक्रम युवा पर्यटन मंडळामार्फत केंद्र शासनाच्या पर्यटन मंत्रालयाच्या संकेतस्थळावर या संदर्भात वेळोवेळी देण्यात येणाऱ्या मार्गदर्शक सूचना/ धोरणाची अंमलबजावणी करणे आवश्यक राहील.

३. युवा पर्यटनमंडळ स्थापन करण्यासाठी प्रोत्साहन स्वरुप अनुदान म्हणून सन २०२३-२४ या वित्तीय वर्षामध्ये शाळांमध्ये स्थापन केलेल्या प्रत्येकी एका क्लबसाठी रु.१०,०००/- व महाविद्यालयामध्ये स्थापन करण्यात आलेल्या प्रत्येकी एका क्लबसाठी रु.२५,०००/- असे एकूण तरतूद केलेल्या रु.२५.०० कोटी निधीमधून ‘प्रथम येईल त्यास प्राधान्य’ या तत्वावर पर्यटन संचालनालयाकडे प्रस्ताव सादर करणाऱ्या

शाळा / महाविद्यालयांना देण्यात येईल. यावर होणारा खर्च पर्यटन संचालनालयाकडे ‘प्रसिध्दी’ या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात येईल. याकरीता आवश्यक तपासणी सूची (Check List) परिपत्रकासोबत जोडण्यात आली आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या http:www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२३०७१८१६३७४४३४२३ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

RADHIKA RASTOGI

Digitally signed by RADHIKA RASTOGI
DN: c=IN, o=Personal, pseudonym=3FEEF7CAAEF7F29228C1D884F1C3A5A76D778FED, 2.5.4.20=d651a79a6337b2eb26e07c965a1cc65b42c0f01cfa14bbe5c5772a587e510bbb, postalCode=400035, st=Maharashtra, serialNumber=29D171738552C85A1184A9DC20EDBE68EA10CCCE981E03D208EFA117377125E9, cn=RADHIKA RASTOGI
Date: 2023.07.18 16:43:22 +05'30'

**( राधिका रस्तोगी )**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. मंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा. सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा. विरोधी पक्षनेता विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
७. मा. विरोधी पक्षनेता विधानसभा, विधानभवन, मुंबई.
८. मा. सर्व विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
९. मा. सर्व विधानसभा सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
१०. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. प्रधान सचिव उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
१५. आयुक्त, शालेय शिक्षण, पुणे.
१६. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१७. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई.
१८. संचालक, कला संचालनालय, मुंबई.
१९. सर्व विभागीय आयुक्त
२०. सर्व जिल्हाधिकारी
२१. सर्व मंत्रालयीन विभाग
२२. निवडनस्ती, कार्यासन-पर्यटन.

## <u>तपासणी सूची (Check List)</u>

१. पर्यटन संचालनालयाकडे नोंदणी करताना पुढील कागदपत्रे आवश्यक आहेत :-

अ) सर्व विद्यार्थी सदस्यांचे आधार क्रमांक.

ब) शिक्षक व विद्यार्थी समन्वयकाचे आधार क्रमांक.

२. प्रस्ताव मुख्याध्यापक/ प्राचार्यांच्या स्वाक्षरीने पाठविणे आवश्यक आहे.

३. क्लब स्थापन केल्यानंतर पर्यटन स्थळांना भेटी देण्याबाबतचे छायाचित्रांसह अहवाल प्राचार्यांच्या स्वाक्षरीने सादर करावा.

****